**राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (NRDWP}**
**पिण्याच्या पाणी पुरवठा विहिरींना स्त्रोत शाश्वतते अंतर्गत रिचार्ज शाफ्टव्दारे पुनर्भरण करून पाणी पुरवठा शाश्वत करणे.**

**महाराष्ट्र शासन,**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,**
**शासन निर्णय क्र. आपना-४११०/प्र.क्र.८९-/पापु-१५,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक २६ जुलै, २०१०**

**प्रस्तावना :**

राज्यातील सुमारे ८०% पेयजलाचे स्त्रोत भूजलावर आधारित आहेत. राज्यातील अनियमित पर्जन्यमान, कठीण भूस्तरीय रचना, काही भागात सिंचनासाठी होणारा अतिउपसा इत्यादीमुळे उन्हाळ्यात भूजलाची पातळी खाली जाते व पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्माण होते. पेयजल स्त्रोतांना बळकट केल्यास ग्रामीण जनतेला पुरेसे पिण्याचे पाणी उन्हाळ्यात देखिल उपलब्ध होऊ शकेल.

केंद्र शासनाच्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या सुधारित मार्गदर्शक सुचनांमध्ये पेयजल स्त्रोत शाश्वती (Source Sustainability)वर जास्त भर दिला असून पिण्याच्या पाणी पुरवठयाचे उद्‌भव वर्षभर टिकविणे अत्यंत आवश्यक आहे. तसेच जनतेला उपलब्ध होणारे पिण्याचे पाणी चांगल्या गुणवत्तेचे देखिल असणे गरजेचे आहे.

ग्रामीण भागातील पिण्याच्या पाण्याच्या विहिरीतून पोहऱ्याने पाणी उपसण्यात येते. त्यामुळे विहिरीतील पाणी प्रदूषित होते. तसेच पाण्याचा अपव्यय देखिल होतो. हे टाळण्यासाठी भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेने अभ्यास करून विहीर परिसरातील भूजल संपत्तीत वाढ करण्यासाठी रिचार्ज शाफ्ट व पाणी उपसण्यासाठी सुधारित हातपंप विकसित केला आहे. त्यामध्ये भूजल पुनर्भरणाची व्यवस्था असून पाण्याची गुणवत्ता अबाधित राखणे व पाण्याचा अपव्यय टाळणे या दृष्टीने सुविधा निर्माण केलेली आहे. या प्रणालीचा अवलंब केल्यास ग्रामीण भागातील दूरवर असलेल्या वाडया/वस्त्यांना शाश्वत पाणी पुरवठा करता येणे शक्य आहे.

वरील पार्श्वभूमि विचारात घेऊन राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सार्वजनिक पाणी पुरवठा विहिरींना रिचार्ज शाफ्टव्दारे पुनर्भरण करुन पेयजल स्त्रोत शाश्वत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सार्वजनिक पाणी पुरवठा विहिरींना रिचार्ज शाफ्टव्दारे पुनर्भरण करुन पेयजल स्त्रोत शाश्वत करणेचा कार्यक्रम भूजल सर्वेक्षण आणि विकास

यंत्रणेमार्फत संपूर्ण राज्यात राबविण्यास शासन मान्यता देत आहे. योजनेची प्रभावी अंमलबजावणी होणेकरिता योजनेची संकल्पना, योजना राबविण्याचे निकष, मार्गदर्शक सूचना, निधीची उपलब्धता व संनियंत्रण , इत्यादि बाबी पुढीलप्रमाणे आहेत

**१.१) योजनेची संकल्पना :-**

राज्यातील बहुतांश ग्रामीण भागात पिण्याचे पाणी साध्या विहिरीव्दारे उपलब्ध होते. विहिरीची खोली आवश्यकतेपेक्षा कमी असल्याने अथवा जलधर खडक पूर्णत: भेदलेला नसल्याने अशा विहिरी उन्हाळयात कोरडया होतात व पिण्याच्या पाण्याची टंचाई जाणवते. पिण्याच्या पाण्याच्या विहिरींमध्ये बारमाही पाणी उपलब्ध राहण्याकरिता विहिरीच्या तळाला कमाल ३० मीटर खोलीचे विंधण छिद्र (रिचार्ज शाफ्ट) घेतल्यास पावसाळयाच्या कालावधीत विहिरीच्या परिसरातील भूस्तरात विंधण छिद्राव्दारे भूजलाचे पुनर्भरण होऊन सदरील जलधर संपृक्त होईल. तसेच या तंत्रामुळे भूगर्भात पाण्याचा अतिरिक्त साठा निर्माण होऊन त्या भागात असलेल्या विहिरींना परिणामस्वरुप पुनर्भरणाचा फायदा होऊन विहिरीतील पाणी पातळीत वाढ होईल. उन्हाळयाच्या कालावधीत साध्या विहिरीतील भूजल पातळी खाली गेली अथवा विहिर कोरडी झाल्यास रिचार्ज शाफ्टव्दारे उपलब्ध असलेले भूजल पिण्यासाठी वापरता येईल. याकरिता रिचार्ज शाफ्टमध्ये सुधारित व नव्याने विकसित केलेली हातपंप प्रणाली उभारुन ग्रामीण जनतेला पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देण्यात येईल. त्यामुळे विहिरीतील पाणी प्रदूषित होणार नाही व पाण्याचा अपव्यय टळेल.

विहिर खोलीकरण योजनेत विहिरीची खोली वाढविण्यासाठी सुरुंग लावावे लागतात. त्यामुळे विहिरींचे बांधकाम ढासळण्याची शक्यता असते. शिवाय गावालगतच्या विहिरींमध्ये सुरक्षिततेच्या कारणांस्तव सुरुंग घेता येत नाहीत, अशा विहिरींची खोली वाढविण्याऐवजी रिचार्ज शाफ्ट घेणे जास्त सोयीचे आहे.

**१.२) योजनेच्या अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक तत्वे :-**

**१. गाव/वाडी/वस्तीच्या निवडीचे निकष -**

खालील निकषांची पूर्तता करणा-या गाव/वाडी/वस्तीमध्ये ही योजना राबविण्यात यावी.

१) सदर योजना फक्त सार्वजनिक पाणी पुरवठा विहिरीवरच राबविण्यात येईल.
२) उन्हाळयात टँकरने पाणी पुरवठा करावा लागणा-या गावे/वाडया/वस्त्या

३) विहिरींव्दारे आठमाही/दहामाही पाणी उपलब्ध होऊ शकणा-या गावे/वाडया/वस्त्या

**२. प्रकल्प अहवाल :-**

गाव/वाडी/वस्तीची निवड झाल्यावर प्रस्तावित उपाययोजनेसाठी जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी प्रकल्प अहवाल तयार करावा. यात विहिरीची क्षमता,

पाण्याची गुणवत्ता, गाव/वाडी/वस्तीतील पाणी पुरवठा साधनांची सद्यस्थिती, लोकसंख्या, भूशास्त्रीय जडण-घडण, रिचार्ज शाफ्ट घेण्यासाठी स्थळ निश्चिती, इत्यादी बाबतची माहिती अंर्तभूत असावी.

३. **योजनेची अंमलबजावणी :-**

प्रस्तुत योजना ही जलपुनर्भरणाशी निगडित असल्याने यात भूस्तराची तांत्रिक तपासणी, भूस्तरात पाणी ग्रहण करण्याची क्षमता, सुधारित हातपंपाच्या उभारणीत कुशल कामाचा अंतर्भाव इत्यादी बाबी समाविष्ट असल्यामुळे सदर योजना भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमार्फत राबविण्यात येणार आहे. या योजनेचे संनियंत्रण उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांच्याव्दारे केले जाईल. विहिरीतील रिचार्ज शाफ्टव्दारे जल पुनर्भरणाची कामे वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा हे राबवतील. या योजनेंतर्गत प्राकलने व आराखडे जिल्हा कार्यालयातील सहा. भूवैज्ञानिक तयार करतील. त्यास तांत्रिक मान्यता वरिष्ठ भूवैज्ञानिक देतील. या योजनेस उपसंचालक हे प्रशासकीय मान्यता देतील. झालेल्या कामाची मोजमापे घेऊन त्याच्या नोंदी कनिष्ठ भूवैज्ञानिक/ सहा. भूवैज्ञानिक मोजमाप नोंदवहीत नोंदवतील. उपसंचालक हे शासनाच्या विंधण कामाच्या प्रचलित दराप्रमाणे जे विंधणयंत्रधारक काम करण्यास इच्छुक असतील त्यांचे सोबत करार करतील. या कार्यक्रमांतर्गत झालेल्या कामाची
भौतिक व आर्थिक प्रगती उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, हे संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचेमार्फत शासनास सादर करतील.

४. **योजनेचे संकल्पचित्र :-**

योजनेचे संकल्पचित्र सोबतच्या **विवरणपत्र - १** मध्ये जोडले आहे.

५. **योजनेंतर्गत कामे :-**

सदर योजनेंतर्गत प्रस्तावित कामे जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, यांचेमार्फत
राबविण्यात येतील.

६. **निधीची उपलब्धतता व योजनेची किंमत :-**

केंद्र शासनाच्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाखाली स्त्रोत शाश्वततेंतर्गत उपलब्ध होणा-या निधीतून विंधण विहिरीची विशेष दुरूस्ती तसेच विहिरीतील गाळ काढणे , रिचार्ज शाफ्ट या योजनेच्या अंमलबजावणीकरिता निधी उपलब्ध करून देण्यात येईल. सदर योजना राबविण्याकरिता लोकवर्गणीची अट नाही. या निधीची वित्तीय मर्यादा व आर्थिक भार खालीलप्रमाणे राहील.

७. **अंमलबजावणी निधी :-**

या योजनेसाठी प्रति योजना रुपये ०.५० लक्ष ( रुपये पन्नास हजार फक्त) एवढी अंमलबजावणी खर्चाची कमाल मर्यादा असून त्यापेक्षा जास्त खर्च अपेक्षित नाही. आदिवासी भागासाठी एकूण खर्चाच्या १०% अधिकची रक्कम अनुज्ञेय राहील.

खर्चाच्या अंदाजपत्रकाप्रमाणे हातपंप व हातपंपास आवश्यक सुटया भागांची खरेदी शासनाच्या दर करारानुसार उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचे स्तरावर करण्यात येईल. तसेच नव्याने विकसित केलेले स्प्रॅाकेट गिअर, चेन बॉक्स, चेन, बेअरिंग,वॉटर चेंबर इत्यादी साहित्य विहित शासकीय खरेदी प्रणालीनुसार उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा हे करतील.

## ८. <u>सहाय्यक सेवा निधी :-</u>

यामध्ये गाव/वाडी/वस्तीच्या निवडीसाठी प्राथमिक सर्वेक्षण, अंमलबजावणी व कामाच्या तपासणीसाठी वाहन भाडयाने लावणे तसेच तांत्रिक अहवाल तयार करणे, मुल्यांकन करणे व इतर अनुषंगिक कामापोटी येणा-या खर्चाचा समावेश असेल. यासाठी प्रति योजना एकूण अंदाजपत्रकीय रक्कमेच्या ५% निधी वेगळयाने उपलब्ध करुन देण्यात येईल. सदर ५% निधी उपसंचालक यांनी वरिष्ठ भूवैज्ञानिक कार्यालयास वर्ग करावा.

प्रति उपाययोजना आवश्यक अनुदानाचा तपशिल, बाबनिहाय मर्यादा व संभाव्य वित्तीय भार याबाबतची माहिती **विवरणपत्र - २** मध्ये दर्शविली आहे.

## ९. <u>अनुदान वितरण प्रणाली:-</u>

या योजनेसाठी संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचेकडे शासनामार्फत अनुदान उपलब्ध करुन देण्यात येईल. उपसंचालक , भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा हे विभागातील वरिष्ठ भूवैज्ञानिकांचे मागणीनुसार संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचेकडे निधीची मागणी सादर करतील. त्यानुसार संचालक उपसंचालकांना अनुदान उपलब्ध करुन देतील. संचालक या निधीचे वाटप विभागीय उपसंचालकांना करतील. अंमलबजावणी निधी पूर्णपणे उपसंचालक यांच्याकडे राहील. उपसंचालक हे ५% सहाय्यक सेवा निधी वरिष्ठ भूवैज्ञानिक यांना वर्ग करतील. उपसंचालक व वरिष्ठ भूवैज्ञानिक यांनी सदर निधी शिवकालीन पाणी साठवण योजनेंतर्गत उघडण्यात आलेल्या खात्यामध्ये जमा करावा. या निधीचे लेखे मात्र त्यांनी स्वतंत्रपणे ठेवावेत.

## १०. <u>योजनेच्या देयकांची अदायगी</u> :-

झालेल्या कामाची देयके वरिष्ठ भूवैज्ञानिक हे अदायगीची शिफारस करुन उपसंचालक यांना सादर करतील. त्यानुसार उपसंचालक देयकांची अदायगी करतील.

## ११. <u>पूर्ण झालेल्या योजनेचे ग्रामपंचायतीस हस्तांतरण</u> :-

रिचार्ज शाफ्टव्दारे पुनर्भरण करुन पाणी पुरवठा शाश्वत करण्याच्या या योजनेची विहित कामे पूर्ण होऊन योजना कार्यान्वित झाल्यानंतर ग्रामपंचायतीस हस्तांतरित करावी. सदर योजनेच्या भविष्यातील देखभाल दुरुस्तीची कामे ग्रामपंचायतीने करावयाची आहेत. त्यासाठी अपेक्षित खर्च भागविण्याकरिता आवश्यक पाणी पट्टी ग्रामपंचायतीने आकारावी.

२.	हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००७२६१८०२१९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
(मालिनी वि. शंकर)
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
१) विभागीय आयुक्त, (सर्व )
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
३) महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
४) जिल्हाधिकारी, (सर्व )
५) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
६) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद(सर्व )
८) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
९) जिल्हा पाणी पुरवठा अधिकारी तथा अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
१०)उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, (सर्व)
११)कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जि.प. (सर्व )
१२)मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
१३)उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती व नागपूर
१४)वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, (सर्व )
१५)	सर्व नियंत्रक अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६)सर्व कोषागार अधिकारी, (सर्व )
१७)	पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने
१८)निवड नस्ती - पापु-१५.

## विवरणपत्र-२

### आवश्यक अनुदानाचा तपशिल, बाबनिहाय मर्यादा व संभाव्य वित्तीय भार (प्रति योजना )

| अ. क्र. | विवरण | मात्रा | परिमाण | दर रू. | एकूण रक्कम रू. |
|---|---|---|---|---|---|
| १. अंमलबजावणी निधी:- | | | | | |
| अ | **रिचार्ज शाफ्ट डिलींग** | | | | |
| | १) १२५ मि.मी. व्यासाचे यु.पी.वही.सी. केसिंग | १.५ | मीटर | ४४०.०० | ६६०.०० |
| | २)११५ मि.मी. व्यासाचे आवेधन काम | ३० | मीटर | २१७.०० | ६,५१०.०० |
| | ३) इनवेल विंधणयंत्राची आवेधन यंत्रणा हाताळणे. | १ | विंधण छिद्र | ६०००.०० | ६,०००.०० |
| | **एकूण (अ )** | | | | **१३,१७०.००** |
| ब | **हातपंप इंडिया मार्क-२ संबंधित सामुग्री** | | | | |
| | १)हेड असेंब्ली- दांडयासह | १ | संच | २३९२.०० | २३९२.०० |
| | २)१२ मि.मी. जाडीचे कनेक्टिंग रॉड (प्रत्येकी ३ मी. लांबीचे ) | ११ | संख्या | १४७.६८ | १६२४.४८ |
| | ३)सिलेंडर असेंब्ली | १ | संच | १२६८.८० | १२६८.८० |
| | ४)३२ मि.मी. जी.आय. पाईप ( प्रत्येकी ३ मी. लांबीचे) | ११ | संख्या | ५८७.६० | ६४६३.६० |
| | **एकूण ( ब )** | | | | **११,७४८.०८** |
| क | **सुधारित हातपंपाचे सुटे भाग** | | | | |
| | १) १००मि.मी., माईल्ड स्टील. आय-सेक्शन ( गर्डर ) ८ मी. लांब (८ कि.ग्रॅ./मीटर ) आय.एस.. | २ | संख्या | २५००.०० | ५०००.०० |
| | २) चेन, गिअर,चेंबर असेंब्ली | १ | संच | ५१५०.०० | ५१५०.०० |
| | ३) चेन बॉक्स चेंबर | १ | संच | ५६५०.०० | ५६५०.०० |
| | ४) पेडस्टल | १ | संख्या | १०००.०० | १०००.०० |
| | **एकूण (क)** | | | | **१६,८००.००** |
| ड | **हातपंप उभारणी व कट्टयाचे बांधकाम** | | | | |
| | १) हातपंप उभारणी | १ | संख्या | १०००.०० | १०००.०० |
| | २) कट्टयाचे बांधकाम (साहित्यासह) | १ | संख्या | ४११०.०० | ४११०.०० |
| | ३) संकीर्ण खर्च | १ | संख्या | ७००.०० | ७००.०० |
| | ४) माहिती फलक | १ | संख्या | २५००.०० | २५००.०० |
| | **एकूण ( ड )** | | | | **८३१०.००** |
| | **एकूण अ+ब+क+ड** | | | | **५०,०२८.०८** |
| | | | | **म्हणजेच रू.** | **५०,०००/-** |
| **२. सहाय्यक सेवा निधी :-** | | | | | |
| | **प्रशासकीय व इतर खर्च (अंदाजपत्रकाच्या ५%)** | | | **रू.२,५००/-** | |
| | **एकूण १+२** | | | **रू. ५२,५०० प्रति योजना** | |